मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ
औरंगाबाद यांच्या न्यायालयीन आदेशानुसार
नुकसानभरपाई अदा करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः COT ०९१४/प्र. क्र. ६०५/१४/तुरूंग -३

जागतिक व्यापार केंद्र, तिसावा मजला, सनफ़्लावर १, सेंटर १,
कफ़ परेड, मुंबई-४०० ००५
तारीखः ३ फेब्रवारी २०१५

वाचा -

१) **मा. उच्च न्यायालय, बॉम्बे, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल क्रिमिनल रिट याचिका क्रमांक ६४०/२००५ या प्रकरणीचे दिनांक ३ जुलै २०१४ रोजीचे आदेश**

प्रस्तावना -

बालाजी गणेशराव पवार यांचा मुलगा बंदी संदीप बालाजी पवार याला मा. तदर्थ अति. सत्र न्यायाधीश, नांदेड यांनी दिनांक २०.८.२००२ रोजी भा.दं.वि. ३०४ अंतर्गत दोषी ठरवून १० वर्षांचा कारावास व रू. ५,०००/- चा दंड (दंड न भरल्यास ६ महिन्यांचा कारावास) अशी शिक्षा ठोठावली होती. सदर बंद्यास नांदेड जिल्हा कारागृहातून नाशिक मध्यवर्ती कारागृह, नाशिक येथे वर्ग करण्यात आले होते. बंद्याने मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या क्रिमिनल अपील क्र. ५१५/२००२ मध्ये मा. न्यायालयाने बंद्याची शिक्षा १० वर्षे कारावासाची शिक्षा ४ वर्ष कारावासात बदलली. त्यामुळे ४ वर्षांची शिक्षा भोगून बंदी संदीप बालाजी पवार याची कारागृहातून दिनांक ३०.४.२००५ रोजी सुटका होणे अपेक्षित होते. सदर बंदी रू. ५०००/- चा दंड भरू न शकल्याने पुढील ६ महिन्यांच्या कारावासानंतर दिनांक ३१.१०.२००५ रोजी त्याची सुटका होणे आवश्यक होते. परंतु, सदर बंद्यास ५३ दिवस उशीराने दिनांक २३.१२.२००५ रोजी कारागृहातून मुक्त करण्यात आले असल्याने उपरोक्त संदर्भ १ मधील आदेशान्वये मा. उच्च न्यायालय, बॉम्बे, औरंगाबाद खंडपीठ यांनी संबंधितांस रू. ५०,०००/- ची नुकसानभरपाई देण्याचे व संबंधीत बंद्यास कारागृहातून मुक्त करण्याबाबत झालेल्या विलंबासाठी जबाबदारी निश्चित करून सदर रकमेची त्यांच्याकडून वसूली करण्याचे आदेश दिले आहेत.

## शासन निर्णय-

सदर आर्थिक मोबदला अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अधीक्षक, नाशिक मध्यवर्ती कारागृह, नाशिक यांना प्राधीकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी नुकसानभरपाईची रक्कम संबंधितास तातडीने अदा करून त्याची पोच पावती शासनास सादर करावी. उपरोक्त नमूद सर्व बाबी विचारात घेता मा. न्यायालयाच्या आदेशानुसार बंदी संदीप बालाजी

पवार याला ५३ दिवस बेकायदेशीरपणे कारागृहात ठेवल्याप्रकरणी भरपाई रक्कम रू. ५०,०००/- अदा करण्यास शासन मान्यता देत आहे व तदनंतर, बंदी संदीप बालाजी पवार यास शिक्षा पूर्ण झाल्यानंतर कारागृहातून उशीराने मुक्त करण्याच्या निष्काळजीपणाची जबाबदारी निश्चित करून संबंधीतांकडून भरपाई रक्कम रू. ५०,०००/- वसूल करण्यात यावी.

उपरोक्त खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखा शीर्ष २०५६, तुरूंग (००) १०१-"तुरूंग" (००)(०२) जिल्हा तुरूंग (२०५६००४४) ५०, इतर खर्च (दत्तमत) या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उपविभाग-दोन, अ. क्र. २, नियम क्र. ७ नुसार प्राशासकीय विभागास प्राप्त वित्तीय अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२८१०३१२७६२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Keshav Jadiye

Digitally signed by Deepak Keshav Jadiye
DN: CN = Deepak Keshav Jadiye, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Home Department
Date: 2015.02.03 16:48:34 +05'30'

**दीपक जडीये**
कक्ष अधिकारी, गृह विभाग

प्रत,

१. अपर पोलिस महासंचालक व पोलिस महानिरीक्षक (कारागृह), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद
५. अधीक्षक, नाशिक मध्यवर्ती कारागृह, नाशिक
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
७. वित्त विभाग (व्यय-८), मंत्रालय, मुंबई
८. गृह विभाग (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई
९. गृह विभाग (तुरूंग-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. गृह विभाग (तुरूंग-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवडनस्ती (तुरूंग-३)